**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अंमलबजावणी करण्यात येणऱ्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिध्दीसाठी निधी वितरण.**
**(लेखाशिर्ष २२२५ ४११३)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र. ०२ / कार्यासन-६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-**४०० ०३२
**दिनांक :- ०२** ऑगस्ट, २०२३.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
२. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२३/प्र.क्र.०२/कार्या-६, दि.०७.०७.२०२३ व दि.२७.०७.२०२३.
३. प्रकल्प अधिकारी तथा सहायक जिल्हाधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, जव्हार, जि.पालघर यांचे पत्र क्र.पुरवठा-२०२३/जाआदि/प्र.क्र./का.७(१)/४७४६, दि.१.८.२०२३.
४. आदिवासी विकास विभाग, नस्ती क्र.आविवि-२०२३/प्र.क्र.१६२ /का-०५.

**प्रस्तावना : -**

आदिवासी विकास विभागामार्फत दि.९ ऑगस्ट, २०२३ रोजी जागतिक आदिवासी दिनाचे राज्यभरात आयोजन करण्यात येत आहे. त्यासाठी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत जव्हार, जि.पालघर जिल्हयामध्ये जनजाती क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अंमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिध्दी या योजनेंतर्गत रु.१४३.०० लाख इतका निधी सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पित तरतुदींतून वितरणासाठी उपलब्ध मर्यादेत वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र. ४ येथील नस्तीवर प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

आदिवासी विकास विभागाच्या "कार्यक्रम खर्च" अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशिर्ष २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे

कल्याण याखाली जनजाती क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अंमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिध्दी या योजनेसाठी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या २० % निधी वितरण मर्यादेत सन २०२३-२४ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून रु.१४३.०० लाख इतका निधी वितरीत व खर्च करण्यास पुढीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **उद्दिष्ट** | **सन २०२३-२४ करीता अर्थसंकल्पित निधी** | **यापूर्वी वितरीत करण्यात आलेला निधी** | **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| जनजाति क्षेत्र उपयोजनेखाली नव्याने अंमलबजावणी करण्यात आलेल्या योजनांची विविध माध्यमांमार्फत माहिती व प्रसिध्दी | २२२५ ४११३ | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३०००.०० | १६८.०३ | १४३.०० |

उपरोक्तप्रमाणे **रु.१४३.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख फक्त) इतका निधी** संबधित नियंत्रक अधिकारी, आयुक्त, आदिवासी विकास यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण (BEAMS) वितरीत व खर्च करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम

तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७२८१२२९०१९९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2023.08.02 18:55:30 +05'30'

**( किरण कि. पवार )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवड नस्ती (का-६).